महसूल व वन विभागाच्या अधिपत्याखालील नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे या कार्यालयातील गट-अ व गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांचे सन २०१७-१८ या वर्षापासून कार्यमूल्यमापन अहवाल महापार प्रणालीत ऑनलाईन पध्दतीने नोंदविण्याकरिता प्राथमिक परिरक्षक व अतिरिक्त परिरक्षक यांच्या नियुक्तीबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र. १२२/म-१,**
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक :- १९ जून, २०१८

<u>वाचा</u> :- शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.सीएफआर-१२५७/प्र.क्र.१३१/तेरा, दि.१५.१२.२०१७

**शासन परिपत्रक :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दि.१५.१२.२०१७ च्या शासन परिपत्रकानुसार सन २०१७-१८ या वर्षापासून गट-अ व गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांचे कार्यमुल्यमापन अहवाल महापार प्रणालीत ऑनलाईन पध्दतीने नोंदविण्यासाठीची कार्यपध्दती सविस्तर विषद करण्यात आली आहे. सदर दि.१५.१२.२०१७ च्या शासन परिपत्रकातील परिच्छेद-५ मध्ये नमूद केल्यानुसार नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांच्या कार्यालयातील सर्व गट-अ व गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांचे कार्यमूल्यमापन अहवाल महापार प्रणालीत ऑनलाईन पध्दतीने नोंदविण्यासाठी नोदंणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांना प्राथमिक परिरक्षक (Primary Custodian) म्हणून नियुक्त करण्यात येत आहे.

२. तसेच संदर्भाधीन परिपत्रकातील परिच्छेद -५ मध्ये नमूद केल्यानुसार खालील रकाना-२ मध्ये दर्शविल्याप्रमाणे OU (Organization Unit) व प्रत्येक OU करिता त्यासमोर रकाना ३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे “अतिरिक्त परिरक्षक- नियुक्त करण्यात येत आहे.:-

| अ.क्रं. | Organization Unit (OU) | अतिरिक्त परिरक्षक |
|---|---|---|
| १ | नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे | नोंदणी उपमहानिरीक्षक (मुख्यालय) |
| २ | अपर मुद्रांक नियंत्रक, प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई | अपर मुद्रांक नियंत्रक, मुंबई |
| ३ | सह संचालक नगररचना, मूल्यांकन,महाराष्ट्र, राज्य, पुणे | सह संचालक नगररचना, मूल्यांकन, पुणे |

| | | |
|---|---|---|
| ४ | नोंदणी उपमहानिरीक्षक मुंबई | नोंदणी उपमहानिरीक्षक मुंबई |
| ५ | नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक, कोकण विभाग ठाणे | नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक, कोकण विभाग ठाणे |
| ६ | नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक,पुणे | नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक,पुणे |
| ७ | नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक, नाशिक | नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक, नाशिक |
| ८ | नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक, औरंगाबाद | नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक, औरंगाबाद |
| ९ | नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक,लातूर | नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक,लातूर |
| १० | नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक,नागपूर | नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक,नागपूर |
| ११ | नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक,अमरावती | नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक,अमरावती |
| १२ | व्यवस्थापक शासकिय छायाचित्र नोंदणी | व्यवस्थापक शासकिय छायाचित्र नोंदणी |

३. अतिरिक्त परिरक्षकांनी त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील सर्व गट-अ व गट-ब (राजपत्रित) अधिकाऱ्यांची संदर्भाधीन शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, दि.१५.१२.२०१७ सोबतच्या **परिशिष्ट-"ड"** मधील प्रपत्रात अद्ययावत माहिती (EMD-Employee Master Data) अतिरिक्त परिरक्षकांमार्फत तयार करून घेऊन NIC यांना Excel Format मध्ये support-mahapar@nic.in या ईमेल आयडीवर उपलब्ध करून देणे. EMD मध्ये नमूद करण्यात आलेला मोबाईल क्रमांक, आधार क्रमांकाशी जोडलेला असावा, जेणेकरून महापार प्रणालीमध्ये ई-साईन या सुविधेचा वापर करणे सुलभ होईल. ही सर्व माहिती अतिरिक्त परिरक्षक यांनी प्राथमिक परिरक्षक यांना पाठवावी. तसेच त्याची आगाऊ प्रत शासनास पाठवावी. अतिरिक्त परिरक्षक आवश्यकतेनुसार त्यांच्या नियंत्रणाखालील एक किंवा अधिक कर्मचाऱ्यांना पार व्यवस्थापक (PAR Manager) घोषित करू शकतील.

४. महापार (MahaPAR) प्रणालीमध्ये विविध स्तरावर कार्य करणाऱ्या अधिकाऱ्यांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१५.१२.२०१७ रोजीच्या शासन परिपत्रकातील **परिशिष्ट-"फ"** मध्ये दर्शविल्यानुसार राहतील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१८०६१९१५५२००५८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shyamsundar Liladhar Patil

Digitally signed by Shyamsundar Liladhar Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=77608e81372f4a37ec0a94ba79f4872babc3f87fcefa96c1e8d62e11df9527f6, cn=Shyamsundar Liladhar Patil
Date: 2018.06.19 15:51:15 +05'30'

**( श्यामसुंदर पाटील )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे
२. अपर मुद्रांक नियंत्रक, प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई
३. सह संचालक नगररचना, मूल्यांकन,महाराष्ट्र, राज्य, पुणे
४. नोंदणी उपमहानिरीक्षक मुंबई,
५. नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक, कोकण विभाग ठाणे,
६. नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक,पुणे,
७. नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक, नाशिक,
८. नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक, औरंगाबाद,
९. नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक,लातूर,
१०.नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक,नागपूर,
११.नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक,अमरावती,
१२.व्यवस्थापक शासकिय छायाचित्र नोंदणी,
१३.निवडनस्ती म-१